**एशियाटीक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजिटायझेशन करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-निधीप्र-२०२४/प्र.क्र.८०/ई-७६६६१२/ग्रं.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०२५.

**वाचा :** १) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१७/ साशि-५, दि.०३. ०६. २०२१.
२) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.७८/साशि-५, दि.२०. ०८. २०२१.
३) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.८१/साशि-५,दि.३०. ०९. २०२२.
४) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.८१/साशि-५, दि.१४. ०३. २०२३
५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र संकिर्ण-२०२३/प्र.क्र.९६/साशि-५, दि.१६.०६. २०२३
६) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१०३/साशि-५, दि.१०.१०. २०२३
७) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. निधीप्र-२०२४/प्र.क्र.८०/ग्रं.क., दि.०२.१२.२०२४.

**प्रस्तावना :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) निधी उपलब्ध करुन देण्यास संदर्भाधीन क्र.१ येथील दि. ०३.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यापैकी ३.६६ कोटी इतका इतका निधी संदर्भीय २ ते ७ येथील शासन निर्णयान्वये आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय यांनी एशियाटिक सोसायटी, मुंबई संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी उर्वरित रक्कम रु.१.३४ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास विनंती केली होती. त्यानुषंगाने एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.३३,००,०००/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर खर्च क्र.डब्लू-४, २२०५, कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (१०) एशियाटीक सोसायटी, मुंबई ग्रंथालयाच्या सर्वांगिण विकास (कार्यक्रम) (२२०५ ३४७५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

४. या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

५. एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने या योजने अंतर्गत केलेल्या कामाचा कामाचा अहवाल ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सादर करावा. तसेच ग्रंथालय संचालक यांनी एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने केलेल्या कामाचा आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २६०/व्यय-५, दि.२०.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३२५१३१७१७७७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

A S MUTYAL

Digitally signed by A S MUTYAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=daee80ec44e60c590272017d95394b0b605cfddee15c8895212ac4add74386f5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BEC50BCA597E7B3FD46D9282C52300269EB689D8C130253FCE76651562083F8B, cn=A S MUTYAL
Date: 2025.03.25 13:18:26 +05'30'

**( अ.शा मुत्याल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन/वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८. अध्यक्ष, एशियाटीक सोसायटी, नगर भवन, मुंबई.
९. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.अवर सचिव ( अर्थसंकल्प कक्ष ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती (ग्रं.क.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.